**सार्वजनिक बांधकाम विभाग, महाराष्ट्र शासन यांचेमार्फत महा इनविट (पायाभूत सुविधा गुंतवणुक संस्था) Maha InvIT (Infrastructure Investment Trust) स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : खाक्षेस-२०२५/प्र.क्र.१५०/रस्ते-८**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १८ जून, २०२५.

**प्रस्तावना : -**

इनविट (InvIT) हे गुंतवणुकदारांकडून भांडवल गोळा करण्यासाठी आणि उत्पन्न मिळवून देणाऱ्या पायाभूत सुविधा प्रकल्पांमध्ये वापरण्याचे व्यासपीठ आहे. ही रचना पायाभूत सुविधांमध्ये वित्तपुरवठा सुधारण्यास मदत करते, मालमत्ता तरलता वाढवते आणि गुंतवणूकदारांना स्थिर परतावा प्रदान करते. इनविट ट्रस्ट मॉडेल अंतर्गत प्रशासनाची देखरेखकरीता ट्रस्टी (Trust), मालमत्ता उपलब्ध करुन देणारे प्रायोजक (Sponsor), गुंतवणूक व्यवस्थापक (Investment Manager) आणि प्रकल्पांची प्रभावी अंमलबजावणीकरीता प्रकल्प व्यवस्थापक (Project Manager) अशी सर्वसाधारण रचना आहे.

पायाभूत सुविधांचे निश्चलीकरण करणे, पायाभूत सुविधा क्षेत्रात दीर्घकालीन गुंतवणूक आकर्षित करणे, रस्ते सुविधेची गुणवत्ता सुधारणे, विद्यमान उच्च किंमतीचे कर्ज दीर्घकालीन कमी किमतीच्या भांडवलामध्ये रुपांतरित करणे यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत महा इनविटची स्थापना करण्याचे प्रस्तावित आहे. टोल, ॲन्युइटी, हायब्रिड ॲन्युइटी व इतर मालमत्तेसाठी इनविट प्रस्तावित आहे.

SEBI च्या नियमांचे पालन करून सदर इनविट संरचित केले जाईल. सदर ट्रस्ट पारदर्शकता आणि गुंतवणूकदारांचे संरक्षण सुनिश्चित करण्यासाठी सर्व प्रशासन, प्रकटीकरण आणि कार्यात्मक निकषांचे पालन करेल.

सार्वजनिक बांधकाम विभाग व महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ/ महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ प्रकल्पाचे सवलतीचे अधिकार व सुनिश्चित मालमत्ता इनविटमध्ये हस्तांतरित करतील आणि भविष्यातील प्राप्त होणारे महसूली उत्पन्न एकरकमी अप फ्रंट स्वरुपात प्राप्त होईल ज्यामुळे तरलता आणि विविध आगामी प्रकल्पांसाठी निधीची उपलब्धता वाढेल.

सद्यस्थितीत SEBI कडे २६ InvIT ची नोंदणी करण्यात आली आहे. सार्वजनिक बांधकाम विभाग, महाराष्ट्र शासन यांचेमार्फत महा इनविट (पायाभूत सुविधा गुंतवणुक संस्था) Maha InvIT (Infrastructure Investment Trust) स्थापन करणेस मान्यता प्रदान करण्याची बाब शासन स्तरावर विचाराधीन होती. याअनुषंगाने मा.मंत्रीमंडळाच्या दि.२९.०४.२०२५ रोजी झालेल्या बैठकीमध्ये शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

१. सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत महा इनविट स्थापन करण्यास तत्त्वत: मान्यता प्रदान करण्यात आली.

२. महा इनविट करीता विशेष प्रयोजन संस्था (Special Purpose Vehicle - SPV) स्थापन करण्यास तत्वत: मान्यता प्रदान करण्यात आली.

३. महा इनविट करीता सार्वजनिक बांधकाम विभाग, महाराष्ट्र शासन प्रायोजक आहे. महा इनविट करीता Indian Trust Act, 1882 अंतर्गत Trust गठीत करण्यास तत्वत: मान्यता प्रदान करण्यात आली.

४. महा इनविट ची रचना, अंमलबजावणी व नोंदणी SEBI (Infrastructure Investment Trust) Regulations, 2014 नियमानुसार करण्यास तत्वत: मान्यता प्रदान करण्यात आली.

५. मा.मंत्रिमंडळाच्या पूर्व मान्यतेनंतर सार्वजनिक बांधकाम विभागाअंतर्गत विभागाचे, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ व महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ यांचेकडील निवडक पायाभूत सुविधा प्रकल्पांचा महा इनविट मध्ये हस्तांतरीत करण्यास व खाजगी/ सार्वजनिक गुंतवणूकदारांकडून निधी संकलनाची प्रक्रिया सुरू करण्यास तत्त्वत: मान्यता प्रदान करण्यात आली.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६१८१२०३१४०११८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADNYA SUBHASH WALKE

Digitally signed by PRADNYA SUBHASH WALKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=03547a345c47dd48007cd8b37a04c70078198a1a3a877ea19b46344a4c1470d4, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D7D0C662BC335A39B2B57F9BEA7376AD5B8FA997E2E98FD45A95D4AC6B4481FC, cn=PRADNYA SUBHASH WALKE
Date: 2025.06.18 12:03:58 +05'30'

**(प्रज्ञा वाळके)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री, (नगर विकास, गृहनिर्माण, सा.बां.(सा.उ.)) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. उपमुख्यमंत्री, (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व मा.मंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) सर्व मा.राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
९) सर्व मा. विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य.
१०) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
११) महालेखापाल महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेय) मुंबई.
१२) महालेखापाल महाराष्ट्र २ (लेखापरिक्षा) नागपूर.
१३) अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
१४) अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई.
१५) अपर मुख्य सचिव (महसूल व वन विभाग), मंत्रालय, मुंबई.
१६) अपर मुख्य सचिव (नगर विकास विभाग), मंत्रालय, मुंबई.

१७) अपर मुख्य सचिव (सार्वजनिक बांधकाम विभाग), मंत्रालय, मुंबई.

१८) अपर मुख्य सचिव (ग्राम विकास विभाग), मंत्रालय, मुंबई.

१९) अपर मुख्य सचिव (परिवहन), मंत्रालय, मुंबई.

२०) अपर मुख्य सचिव (उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग), मंत्रालय, मुंबई.

२१) अपर मुख्य सचिव (जलसंपदा विभाग), मंत्रालय, मुंबई.

२२) प्रधान सचिव (विधि व न्याय विभाग), मंत्रालय, मुंबई.

२३) प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य विभाग), मंत्रालय, मुंबई.

२४) प्रधान सचिव (पर्यटन विभाग), मंत्रालय, मुंबई.

२५) प्रधान सचिव (पर्यावरण विभाग), मंत्रालय, मुंबई.

२६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

२७) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई.

२८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ, मुंबई.

२९) सर्व सहसचिव/ आंतर वित्तीय सल्लागार तथा उप सचिव/ उप सचिव / अवर सचिव / मंत्रालय, मुंबई.

३०) निवडनस्ती (रस्ते-८).